जिल्हा परिषद स्तरावरील पशुवैद्यकीय संस्थांसाठी आवश्यक औषधी, हत्यारे, अवजारे, यंत्रसामग्री, साधनसामग्री, वैरण बीयाणे, लस, इत्यादी खरेदी केल्यानंतर अशा खरेदींचे दस्ताऐवज लेखापरिक्षणास उपलब्ध करून देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक- पंरास-२०२१ /प्र.क्र. १२५/पदुम-४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक ,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :- २९ डिसेंबर, २०२१

प्रस्तावना :-

विधिमंडळाच्या पंचायती राज समितीकडून जिल्हा परिषदांचे लेखापरिक्षण पुनर्विलोकन तसेच, वार्षिक प्रशासन अहवालावर संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी व इतर सर्व संबंधित अधिकारी यांची साक्ष घेवून तपासणी केली जाते. सदर साक्षीच्या वेळी काही वेळा एखाद्या मुद्याच्या संदर्भात अधिक माहिती जाणून घेण्यासाठी संबंधित मंत्रालयीन विभागीय सचिवांची साक्ष आयोजित केली जाते.

जिल्हा परिषद, सांगली व चंद्रपूर येथे पंचायती राज समितीने भेट देवून मुख्य कार्यकारी अधिकारी व इतर सर्व संबंधित अधिकारी यांची साक्ष घेतली असता जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद यांनी लेखा परिक्षणास आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करून दिलेली नसल्यामुळे मुंबई स्थानिक निधी लेखा परिक्षा अधिनिम, १९३० च्या कलम ७ नुसार संबंधितांकडून रू.२५,०००/- पर्यंतची दंड वसूली करण्याची शिफारस केलेली आहे. सदर शिफारशीस संबंधित विभागीय आयुक्त यांची मान्यता प्राप्त करून घ्यावयाची असते.

जिल्हा परिषद स्तरावरील पशुवैद्यकीय संस्थांसाठी जिल्हा परिषदांकडून आवश्यक औषधी, हत्यारे, अवजारे, यंत्रसामग्री, साधनसामग्री, वैरण बीयाणे, लस, इत्यादी बाबी खरेदी केल्यानंतर अशा खरेदींचे दस्ताऐवज लेखापरिक्षणास उपलब्ध होण्यासाठी ते संबंधित नस्तीमध्ये व्यवस्थित लावून त्यास पृष्ठांकन क्रमांक देवून ठेवणे आवश्यक आहे.

स्थानिक लेखा नीधी संदर्भात लेखा परीक्षणाचा कार्यक्रम जिल्हा परीषदेच्या पशुसंवर्धन विभागास आगाऊ कळविण्यात येतो. त्यामुळे प्रत्यक्ष लेखापरीक्षन सुरु होइपर्यंत निश्चितच काही कालावधी मिळत असल्याने या कालावधीत लेखापरीक्षणास आवश्यक सर्व दस्ताऐवज / नस्त्या अद्ययावत करुन ठेवणे आवश्यक आहे.

खरेदी संदर्भातील पुरवठा आदेश, डिलेव्हरी चलन, पुरवठ्याची देयके, देयके अदा केल्याच्या मुद्रांकित पावत्या, इत्यादी लेखापरिक्षणास उपलब्ध करून देण्याची सर्वस्वी जबाबदारी कार्यरत जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद यांची आहे.

ज्या वेळी मागील कालावधीतील लेखापरिक्षण होते अशा वेळी त्या कालावधीत कार्यरत असलेले जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी इतरत्र शासन सेवेत कार्यरत असल्यास त्यांचे आवश्यक ते सहकार्य घेवून लेखापरिक्षणास आवश्यक ते सर्व दस्ताऐवज अद्ययावत करुन घेण्यात यावे.

विविध जिल्हा परिषदांच्या अनुषंगाने सचिव / प्रधान सचिव (पदुम) यांची पंचायती राज समितीने घेतलेल्या साक्षीच्या वेळी झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक :-**

१. विविध योजनांमध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून औषधी, हत्यारे, अवजारे, यंत्रसामग्री, साधनसामग्री, वैरण बीयाणे, लस, इत्यादी बाबी खरेदी करण्यासाठी खरेदी प्रक्रिया राबवितांना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२, भाग-III/ उद्योग-४ दि.१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णया सोबतची शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका मधील तरतुदींचे काटेकोरपणे पालन होईल असे पहावे.

२. जिल्हा परिषदेंतर्गत असलेल्या पशुवैद्यकीय दवाखान्यांसाठी औषधी खरेदी करतांना औषधींची मागणी जिल्ह्यातील सर्व पशुवैद्यकीय दवाखान्यांकडून घेण्यात यावी. पशुवैद्यकीय दवाखान्यांनी त्यांच्या दवाखान्यात गत तीन वर्षात उपचारासाठी आलेल्या पशुरूग्णांच्या आजाराचा आढावा घेवून त्याप्रमाणे आवश्यक असलेल्या औषधींचीच मागणी करावी.

३. औषधी, हत्यारे, अवजारे, यंत्रसामग्री, साधनसामग्री, वैरण बीयाणे, लस, इत्यादी बाबी खरेदी करतांना खरेदी प्रक्रियेस सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी. तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्याशिवाय पुरवठा आदेश देण्यात येवू नयेत.

४. खरेदी करावयाच्या ज्या बाबींचे विर्निदेश प्राप्त नाहीत अशा बाबीस विभागाच्या तांत्रिक विर्निदेश समितीची मान्यता प्राप्त करून घेण्यात यावी.

५. संबंधित पुरवठादारास पुरवठा आदेश देतांना पुरवठ्याच्या वेळी प्राप्त होणाऱ्या डिलेव्हरी चलन व देयकावर सदरहू औषधींचा उत्पादन दिनांक, अंतिम वैधता दिनांक आणि बॅच नंबर नमूद करणे आवश्यक असल्याबाबत कळविण्यात यावे.

६. प्रत्यक्ष औषधींचा पुरवठा झाल्यानंतर डिलेव्हरी चलन व देयकावर नमूद औषधींचा उत्पादन दिनांक, अंतिम वैधता दिनांक आणि बॅच नंबर याचा तपशील पडताळून तो योग्य असल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. डिलेव्हरी चलन औषधी प्राप्त करणाऱ्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीसह घेण्यात यावे.

७. प्राप्त झालेल्या औषधी, हत्यारे, अवजारे, यंत्रसामग्री, साधनसामग्री, वैरण बीयाणे, लस, इत्यादी बाबींची नोंद प्राप्त दिनांकासह साठा नोंदवहीत घेण्यात यावी व या नोंदवहीत सदरहू बाबी कोणत्या आर्थिक वर्षात व कोणत्या योजनेतून खरेदी करण्यात आलेल्या आहेत याचा स्पष्टपणे तपशील नमूद करण्यात यावा. साठा नोंदवहीतील सर्व रकाने बिनचूक माहितीसह भरण्यात यावे. सदरहू कार्यवाही जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी,

जिल्हा परिषद कार्यालयातील संबंधित कर्मचारी /अधिकारी यांची राहील. तथापि, सदर बाबीवर सनियंत्रण करण्याची सर्वस्वी जबाबदारी जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी यांची राहील.

८. सदरहू औषधींचा जिल्ह्यातील पशुवैद्यकीय संस्थांना पुरवठा केल्यानंतर संस्था प्रमुखाची औषधी प्राप्त झाल्याबाबतची पोच पावती घेण्यात यावी .

९. प्राप्त औषधींच्या प्रत्येक बॅचची गुणवत्ता तपासणी करून अहवाल प्राप्त झाल्यानंतरच पुरवठा धारकास देयकाचे प्रदान करण्यात यावे व पुरवठा धारकास रकमेचे प्रदान केल्याबाबतची मुद्रांकित पावती नस्तीमध्ये संलग्न करण्यात यावी .

१०. देयक अदा करतांना नियमानुसार टीडीएस व जीएसटी कपात करण्यात यावी. कपात केलेला टीडीएस व जीएसटी विहित कालमर्यादेत संबंधित यंत्रणेकडे जमा करून तसे प्रणाणपत्र संबंधित पुरवठा धारकास देणे अनिवार्य आहे.

११. पुरवठा धारकास पुरवठा आदेश दिल्यानंतर त्यांनी ६० दिवसांच्या किंवा निविदेतील नमुद पुरवठा कालवधीच्या आत पुरवठा करणे बंधनकारक असून सदर कालावधीनंतर विलंबाने पुरवठा केल्यास संबंधितांकडून एकूण मागणी किंमतीच्या ०.५ टक्के दराने प्रति आठवडा यानुसार विलंब शुल्क आकारणी करण्यात यावी. सदर विलंब शुल्क रु.२.०० लक्ष पर्यंतच्या पुरवठयासाठी जास्तीत जास्त १० टक्के तर रु. २.०० लक्ष वरील पुरवठयासाठी जास्तीत जास्त ५ टक्के इतका असावा.

तरी राज्यातील जिल्हा परिषदांच्या पशुसंवर्धन विभागांचे लेखापरिक्षण होत असताना स्थानिक निधी लेखापरिक्षण पथकास लेखा परिक्षणासाठी सर्व आवश्यक दस्ताऐवज उपलब्ध होईल असे पहावे .

सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२११२२९१५४४५०५६०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: CN = DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2021.12.29 15:50:34 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड, मुंबई.
४. सर्व विभागीय आयुक्त.
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.

६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
७. उपसचिव (पंचायतह राज समिती) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता )-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९. सर्व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१०. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन
११. सर्व सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.
१३. सर्व सहाय्यक संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षण.
१४. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१५. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (पदुम-४).